महाराष्ट्र दारुबंदी (सुधारणा) अध्यादेश, २०१९ आणि त्याअनुषंगाने मद्य बाळगण्याविषयी मर्यादा निश्चित करण्याबाबत पारीत करण्यात आलेले शासन आदेश व्यपगत झाल्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्र: एमआयएस-०९१९/प्र.क्र.३३३/राउशु-३,**
५ वा मजला (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- २४ फेब्रुवारी, २०२०.

वाचा :- १. शासन अधिसुचना, एफएलआर-१७११/प्र.क्र.८२/राउशु-२, दि.२८.८.२०१५.
२. शासन अधिसुचना, एफएलआर-१७१६/प्र.क्र.१६७/राउशु-२, दि.२८.११.२०१६.
३. शासन आदेश, क्र.एमआयएस-०९१९/प्र.क्र.३३३/राउशु-३, दि.१९.९.२०१९.

**शासन परिपत्रक-**

चंद्रपूर, गडचिरोली व वर्धा या तीन दारुबंदी असलेल्या जिल्ह्यांमध्ये दारुबंदी कायद्यामध्ये सुधारणा करावी व शिक्षेमध्ये वाढ करावी यासाठी महाराष्ट्र दारुबंदी कायदा, १९४९ मध्ये दि.१८ सप्टेंबर, २०१९ रोजी महाराष्ट्र दारुबंदी (सुधारणा) अध्यादेश, २०१९ (सन २०१९ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.२५) हा प्रख्यापित करण्यात आला. सदर अध्यादेशामधील "विहित मर्यादा" या व्याख्येच्या अनुषंगाने, विवक्षित परिमाणातील मादक द्रव्य किंवा पैशाच्या विवक्षित रकमेपर्यंत किंमत असलेले मादक द्रव्य जवळ बाळगण्यासाठी विहित मर्यादा, शासन आदेश, दि.१९ सप्टेंबर, २०१९ नुसार शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात आली.

२. प्रस्तुत महाराष्ट्र दारुबंदी (सुधारणा) अध्यादेश, २०१९ (सन २०१९ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.२५) चे विहित कालावधीत अधिनियमात रुपांतर न झाल्याने, दि.२९ डिसेंबर, २०१९ रोजी सदर अध्यादेश व्यपगत (Lapse) झाला आहे. त्यामुळे, सदर अध्यादेशाच्या अनुषंगाने विवक्षित परिमाणातील मादक द्रव्य किंवा पैशाच्या विवक्षित रकमेपर्यंत किंमत असलेले मादक द्रव्य जवळ बाळगण्यासाठी मर्यादा निश्चित करण्यासाठी शासनाच्या दि.१९ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात आलेले शासन आदेश देखील व्यपगत झाले आहेत. सदर बाब माहिती व योग्य त्या कार्यवाहीसाठी सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणण्यात येत आहे.

३. मुंबई विदेशी मद्य नियम, १९५३ मधील नियम ७० (डी) च्या उपनियम (६) मधील तरतुदीनुसार, उपरोक्त वाचा येथील क्र.१ आणि २ मधील शासन अधिसुचनेन्वये, मद्य जवळ बाळगण्याबाबत विहित करण्यात आलेली मर्यादा कायम आहे, याची नोंद घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००२२४१६४५४२६८२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhakar Shahaji Yadav

Digitally signed by Sudhakar Shahaji Yadav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e782c1e59acd749fc48c691d7a8c477d6ac39c1904204f442b52d728d48a67a, cn=Sudhakar Shahaji Yadav
Date: 2020.02.24 16:48:31 +05'30'

**( सु. श. यादव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. राज्यमंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
७. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. सर्व जिल्हाधिकारी,
९. सर्व विभागीय उपआयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
१०. सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
११. निवड नस्ती.